**अधिकार अभिलेख**

अधिकार अभिलेख विषयक विविध गाव नमुन्यातील नोंदवह्या अद्ययावत ठेवण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः एस-३०/२०१४/प्र.क्र.२७३/ज-१**

पहिला मजला,मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: ५ मार्च, २०१५

**वाचा -**

१) महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या प्रकरण-२ व प्रकरण-१०

२) महाराष्ट्र जमीन महसूल मंडळ अधिकारी व मंडळ निरीक्षक (कर्तव्य व कार्य) नियम, १९७०

३) महाराष्ट्र जमीन महसूल अधिकार अभिलेख आणि नोंदवह्या (तयार करणे व सुस्थितीत ठेवणे) नियम, १९७१

४) महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक, शिस्त आणि अपील) नियम,१९७९

५) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१००३/प्र.क्र.१९६/ल-१, दिनांक २९.९.२००३

**प्रस्तावना -**

राज्याच्या विविध जिल्ह्यात संदर्भाधीन अधिनियमातील तरतूदीप्रमाणे अधिकार अभिलेख विषयक नोंदवह्या विहीत नमुन्यात ठेवण्यात येत नसल्याबाबत तसेच सदर अभिलेख अद्ययावत ठेवण्यात येत नसल्याबाबत शासनाकडे तक्रारी प्राप्त झाल्या आहेत. त्या अनुषंगाने तहसिलदार, मंडळ अधिकारी/मंडळ निरिक्षक, तलाठी व अन्य क्षेत्रीय महसूल अधिकारी यांना उक्त नियमांची पूर्तता करुन अधिकार अभिलेख विषयक गाव नमुने अद्ययावत ठेवण्यासंदर्भात कार्यवाही करण्याबाबत सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक-**

उपरोक्त बाब विचारात घेऊन, महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ मधील तरतूदी व संदर्भाधीन नियम यामधील तरतूदी यानुसार प्राप्त असलेल्या अधिकारात, सर्व तहसिलदार, मंडळ अधिकारी/मंडळ निरिक्षक, तलाठी व अन्य क्षेत्रीय महसुल अधिकारी यांना उक्त अधिनियम/नियमातील तरतूदींचे तंतोतंत पालन करुन, सदर अधिनियम/नियमावलीतील तरतूदीनुसार अधिकार अभिलेखातील विविध नोंदवह्या शासनाने विहित केलेल्या नमुन्यातच ठेवणे, त्यांचे जतन करुन त्या सुस्थितीत ठेवणे याबाबीची पूर्तता करण्याकरीता खालीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत :-

१) राज्यातील सर्व अधिकार अभिलेख नोंदवह्या उक्त नमूद अधिनियम व नियम यामधील तरतूदीचे पालन करुन वेळीच नियमितपणे अद्ययावत करण्यात याव्यात.

२) अधिकार अभिलेख विषयक गाव नमुना नोंदवह्या या शासनाने विहित केलेल्या नमुन्यातच ठेवण्यात याव्यात.

३) शासनाने महाराष्ट्र जमीन महसूल मंडळ अधिकारी व मंडळ निरीक्षक (कर्तव्य व कार्य) नियम, १९७० तयार केलेले आहेत. सदर नियम व महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ मधील

तरतूद पहाता, "महाराष्ट्र जमीन महसूल अधिकार अभिलेख आणि नोंदवह्या (तयार करणे व सुस्थितीत ठेवणे) नियम, १९७१" या नियमावलीतील तरतूदीनुसार अधिकार अभिलेख आणि नोंदवह्या अद्ययावत ठेवून त्यांचे जतन करण्याची कार्यवाही संबंधित तहसिलदार, मंडळ अधिकारी/मंडळ निरिक्षक, तलाठी आणि संबंधित क्षेत्रीय महसूल अधिकारी/प्राधिकारी यांची राहील.

४) उक्त अधिनियम, तसेच नियमातील तरतूदीनुसार तहसिलदार, मंडळ अधिकारी/मंडळ निरिक्षक, तलाठी आणि क्षेत्रीय महसूली अधिकारी/प्राधिकारी यांनी अधिकार अभिलेखातील नोंदी अद्ययावत करुन अधिकार अभिलेखातील नोंदवह्यांचे जतन करण्याच्या कर्तव्यात कसूर केल्यास ते महाराष्ट्र नागरी सेवा नियम १९७९ नुसार शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील. याची सर्वांनी नोंद घ्यावी.

५) जिल्हाधिकारी यांनी उपरोक्त सूचनाप्रमाणे कार्यवाही होत असलेची खात्री करावी.

०२. सदर शासन परिपत्रकातील सुचनांप्रमाणे सत्वर कार्यवाही करण्यात यावी.

०३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१५०३०५१६४०१७७९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०५१६४०१७७९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Shridharrao Kothekar

Digitally signed by Sunil Shridharrao Kothekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sunil Shridharrao Kothekar
Date: 2015.03.07 12:14:25 +05'30'

**सुनिल कोठेकर**
**अवर सचिव, महसुल व वन विभाग**

प्रत,

१. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव (महसूल) यांचे विकाअ/स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.

४. सर्व विभागीय आयुक्त,

५. जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.

६. सर्व जिल्हाधिकारी / अपर जिल्हाधिकारी

७. सर्व तहसिलदार.

८. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा, महाराष्ट्र राज्य,(१) मुंबई.

९. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा, महाराष्ट्र राज्य,(२) नागपूर

१०. सर्व सहसचिव/उपसचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

११. “ज” समूहातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२. विधानमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई-३२

१३. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.

१४. निवडनस्ती, कार्यासन-ज-१, महसूल व वन विभाग